महाराष्ट्र विकास सेवा गट - अ मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांक : मविसे-१०२०/प्र.क्र.१६/२०२०/आस्था-३,**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.

तारीख : १० फेब्रुवारी, २०२०.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि उक्त अधिनियमाच्या कलम ४ (१) (२) (४) व ४(५) मधील तरतुदीनुसार विनंती व प्रशासकीय कारणास्तव सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने खालील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिकाऱ्यांची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.एस.व्ही.कवडे, उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामिण गृहनिर्माण कक्ष, मुंबई (प्रतिनियुक्तीने कार्यरत) | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद, जिल्हा औरंगाबाद | रिक्त पदी |
| २. | श्री.गिरीश सु. धायगुडे, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, सिंदेवाही, जिल्हा परिषद , चंद्रपूर, जिल्हा चंद्रपूर | व्याख्याता (शेती), ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जिल्हा.कोल्हापूर | रिक्त पदी (शासन आदेश दि.२८.०२.२०१९ अन्वये करण्यात आलेली बदली या आदेशाद्वारे रद्द करण्यात येत आहे.) |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| ३. | श्री.सी.पी.जाधव, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पांढरकवडा, जिल्हा अमरावती | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, तिवसा, जिल्हा अमरावती | रिक्त पदी |

२. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा . तसेच त्यांनी अनाधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास , ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. जे अधिकारी कार्यमुक्तीनंतर विहित कालावधीत बदली झालेल्या पदावर रुजू होणार नाहीत, अशा अधिकाऱ्यांविरुध्द संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१०११३०१६७४२० डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dr Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr Vasant Gopal Mane
Date: 2020.02.10 14:37:40 +05'30'

(डॉ.वसंत माने)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा. मंत्री ( ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
३) मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
४) मा. अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक,
५) विभागीय आयुक्त (संबंधीत),
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधीत),
७) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामिण गृहनिर्माण कक्ष, मुंबई,
८) जिल्हा कोषागार अधिकारी(संबंधीत),
९) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
१०) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत),
११) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई-०१.